पिण्याच्या पाण्यातील जड धातू, विषारी धातू, कीटकनाशके, रसायने (Fertilizers) इत्यादीची तपासणी करण्यासाठीच्या खर्चास मान्यता देणेबाबत ...

महाराष्ट्र शासन

**पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग**

# शासन निर्णय क्रमांकः डब्ल्यूक्यूएम-२०१४/ प्र. क्र. ०१/ पापु-१२

गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, ७ वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई - ४००००१
तारीख: ३० मार्च, २०१५

वाचा -

१) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर यांचे पत्र क्रमांकः पागुशा-०५१४/ प्र. क्र. १०/ वासो-०२, दि. ०९.०१.२०१५ व दि. १३.०२.२०१५

२) वैज्ञानिक व प्रमुख, जल औद्योगिक व प्रबंध प्रभाग, राष्ट्रीय पर्यावरण व अभियांत्रिकी संस्था (नीरी), नागपूर यांचे पत्र क्रमांकः डब्ल्यूटीएम/ ८०/ २०१४, दि. ०८.०९.२०१४

३) केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना ( Uniform Drinking Water Quality Monitoring Protocol )

प्रस्तावना -

केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार राज्यस्तरीय प्रयोगशाळांमध्ये जड धातू, विषारी धातू, कीटकनाशके, रसायने इत्यादींची तपासणी करण्याची यंत्रणा असणे गरजेचे आहे. राज्यामध्ये पिण्याच्या पाण्यातील जड धातू, विषारी धातू, कीटकनाशके, रसायने (Fertilizers) इत्यादींची तपासणी करण्याचे काम ( पाणी नमुने गोळा करणे, पाणी नमुने तपासणे, तपासणी अहवाल तयार करणे, त्याची नोंद केंद्र शासनाच्या संकेस्थळावर नोंदी घेणे, प्रशिक्षण देणे ) इ. साठी राज्यातील सक्षम संस्थेची निवड करण्याबाबत प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे अध्यक्षतेखाली दि. २८.०५.२०१४ च्या बैठकीत निर्णय घेण्यात आला. या निर्णयास अनुसरुन योग्य त्या सक्षम संस्थेची निवड करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

(कृ. मा. प.)

**शासन निर्णय** -

राज्यामध्ये पिण्याच्या पाण्यातील जड धातू, विषारी धातू, कीटकनाशके, रसायने (Fertilizers) इत्यादींची तपासणी करण्याचे काम व त्यासाठी संबंधितांना प्रशिक्षण देण्याचे काम राष्ट्रीय पर्यावरण अभियांत्रिकी संशोधन संस्था (नीरी), नागपूर यांना देण्यास व या कामासाठी निरी, नागपूर आणि संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर, नवी मुंबई यांच्यात सामंजस्य करार करण्यास या आदेशान्वये मान्यता देण्यात येत आहे.

सदर कामाची रुपरेषा खालीलप्रमाणे आहे :-

अ) नीरी, नागपूर या संस्थेमार्फत १२ जिल्ह्यांपैकी, पहिल्या टप्प्यामध्ये, अमरावती, अकोला (खारपणा अधिक असलेले जिल्हे) व नागपूर या तीन जिल्ह्यांतील व दुसऱ्या टप्प्यामध्ये भंडारा, गोंदिया, गडचिरोली, चंद्रपूर, वर्धा, बुलढाणा, यवतमाळ, सिंधुदुर्ग व कोल्हापूर या ९ जिल्ह्यांतील पिण्याच्या पाण्याच्या नमुन्यांची तपासणी करण्यात यावी.

आ) नीरी, नागपूर या केंद्र शासनाच्या अधिपत्याखालील संस्थेमार्फत ,पिण्याच्या पाण्यातील पुढील घटकांची तपासणी करावी.

- जड धातू : Cu, Fe, Mn, Zn, Ni, Pb, Cd, Co, Cr (एकूण ९ घटक)
- कीटकनाशके : HCH isomers, opu DDD & pp DDE, Endosulphan, Aldrin and Dicofol (एकूण ५ घटक)
- रसायने (Fertilizers) : N, P, K (एकूण ३ घटक)

इ) जड धातू, विषारी धातू, कीटकनाशके, रसायने (Fertilizers) इत्यादी घटकांच्या तपासणीचे दर खालीलप्रमाणे असतील -

- जड धातू तपासणीची फी- रु. २०००/- प्रति पाणी नमुना या प्रमाणे ८०० नमुने
- कीटकनाशके तपासणीची फी रु. २०००/- प्रति पाणी नमुना या प्रमाणे ४०० नमुने
- रसायने (Fertilizers) तपासणीची फी रु. १०००/- प्रति पाणी नमुना या प्रमाणे ८०० नमुने

वरील सर्व घटक तपासणीची एकुण फी रु. ५०००/- प्रति पाणी नमुना या प्रमाणे २००० नमून्यांसाठी एकूण रु. ३२.००/- ( रुपये बत्तीस लाख फक्त) इतकी रक्कम व उपरोक्त नमूद घटकांच्या तपासणीसाठी, ३ जिल्ह्यातील २० प्रशिक्षणार्थींची एक तुकडी याप्रमाणे ४ तुकडयांमध्ये प्रशिक्षण देणे आवश्यक राहील. या प्रशिक्षणासाठी रु. ८.००/- (रुपये आठ लाख फक्त) इतका खर्च अशा प्रकारे पाणी नमुना तपासणी व प्रशिक्षण यासाठी एकूण रु. ४०.०० लाख इतका खर्च पुढीलप्रमाणे वितरीत करण्यात येईल.

१) प्रकल्प सुरु होण्यापूर्वी पहिला टप्पा (५०%) रु. २०.०० लाख,
२) प्रकल्पाचे ५० टक्के काम पूर्ण झाल्यावर दुसरा टप्पा रु. १२.०० लाख
३) प्रकल्पाचे संपूर्ण काम पूर्ण झाल्यानंतर तिसरा टप्पा रु. ८.०० लाख या प्रमाणे वितरीत करण्यात येईल.

सदर रु. ४०.०० लाख (अक्षरी रु. चाळीस लाख ) या खर्चास मान्यता देण्यात येत आहे. तसेच प्रकल्प सुरु होण्यापूर्वी पहिला टप्पा ( ५०%) रु. २०.०० लाख (अक्षरी रु. वीस लाख ) एवढया रक्कमेस वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

सदर बाबींवर होणार खर्च सन २०१४-२०१५ व २०१५-२०१६ या आर्थिक वर्षाच्या पाणी गुणवत्ता सनियंत्रण व सर्वेक्षण कार्यक्रमांतर्गत केंद्र शासनाकडून प्राप्त होणाऱ्या निधी मधून भागविण्यात यावा. सदर रक्कम राष्ट्रीय पर्यावरण अभियांत्रिकी संशोधन संस्था (नीरी), नागपूर यांना देण्याबाबतचे आदेश अवर सचिव (पापु-१०), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर, नवी मुंबई यांना द्यावेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३३०१५३९०९०३२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Garud Nandkishor M

Digitally signed by Garud Nandkishor M
DN: CN = Garud Nandkishor M, C = IN, S = Maharashtra, O = Govt. of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2015.03.31 11:24:36 +05'30'

**( नंदकिशोर गरुड )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
२) प्रधान सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
३) विभागीय आयुक्त (सर्व)
४) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर, नरीमन पॉईट, मुंबई.
५) संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे.
६) वैज्ञानिक व प्रमुख, जल औद्योगिक व प्रबंध प्रभाग, राष्ट्रीय पर्यावरण अभियांत्रिकी संशोधन संस्था (नीरी), नेहरु मार्ग, नागपूर-४४००२०
७) जिल्हाधिकारी (अमरावती, अकोला, नागपूर, भंडारा, गोंदिया, गडचिरोली, चंद्रपूर, वर्धा, बुलढाणा, यवतमाळ, सिंधुदुर्ग व कोल्हापूर )
८) उप सचिव व संचालक, (आर. एस. पी. एम. यू.) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय,मुंबई.
९) अवर सचिव (पापु-१०), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय

१०) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (अमरावती, अकोला, नागपूर, भंडारा, गोंदिया, गडचिरोली, चंद्रपूर, वर्धा, बुलढाणा, यवतमाळ, सिंधुदुर्ग व कोल्हापूर )

११) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर, नवी मुंबई.

१२) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर

१३) अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई.

१४) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद (अमरावती, अकोला, नागपूर, भंडारा, गोंदिया, गडचिरोली, चंद्रपूर, वर्धा, बुलढाणा, यवतमाळ, सिंधुदुर्ग व कोल्हापूर )

१५) सर्व कार्यासने पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.

१६) निवड नस्ती पापु-१२